पंचायत समिती, जिंतुर (जि. परभणी) नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०२३/प्र.क्र.२७५/बांधकाम-०४

५वा मजला, २५ मर्झबान पथ, बांधकाम भवन,

फोर्ट, मुंबई, ४०० ००१

तारीख : १५ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांचे पत्र क्रमांकः** जा.क्र.जिप/बांध/ताशा-१/कावि/३७८६/२०२३, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०२३.

२) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांचे पत्र क्रमांकः** जा.क्र.जिप/बांध/ताशा-१/कावि/३९५/२०२३, दिनांक २९ जानेवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

अति. मुख्य कार्यकारी अधिकारी व कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, परभणी यांनी वाचा मधील अनुक्रमांक १ व २ येथील पत्रांन्वये पंचायत समिती, जिंतुर (जि. परभणी) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०२. पंचायत समिती, जिंतूर (जि. परभणी) ची स्थापना झाल्यापासून पंचायत समितीला स्वत:ची जागा उपलब्ध नसल्याने सन १९८४ पासून जुन्या तहसीलच्या इमारतीमध्ये पंचायत समितीचे कामकाज चालत आहे. सदर अस्तित्वातील इमारत हि जुनी व जीर्ण झालेली असल्याने तसेच इमारतीचे बांधकाम चुन्यामध्ये असल्याने प्रशासकीय कामकाज करताना मोठ्या प्रमाणात अडचणी येत आहेत. सद्यस्थितीत पंचयात समितीचे प्रशासकीय कामकाज जुन्या प्राथमिक आरोग्य केंद्राच्या इमारतीमध्ये चालु आहे. सदर इमारत हि जुनी व जीर्ण झालेली असल्याने पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी तसेच अभ्यागतांसाठी प्रशासकीय कामकाजासाठी जागा अपुरी पडत आहे. पंचायत समिती, जिंतूर येथील नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम गट क्रमांक १२९/५/१ या क्षेत्रावर करण्यात येणार आहे. सदर जागा ही पंचायत समिती, जिल्हा परिषद, परभणी यांच्या ताब्यात आहे. पंचायत समिती, जिंतूर (जि. परभणी) येथील बांधकामाचे एकुण क्षेत्रफळ २२०४.०० चौ. मी. इतके प्रस्तावित केले आहे. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, परभणी यांनी पंचायत समिती, जिंतूर नवीन प्रशासकीय इमारतीकरिता उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, छत्रपती संभाजीनगर यांच्या

नकाशावर आधारित, रू.९९९.२५ लक्ष किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केलेले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित असून ते कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, परभणी, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड यांनी साक्षांकित केलेले आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांनी प्रस्तावासोबत जिल्हा परिषद / पंचायत समितीच्या ठरावाची प्रत, जागेचा उतारा, लीड चार्ट, क्वॅरी चार्ट, ले-आऊट प्लॅन, अस्तित्वातील इमारत बांधकामाचे फोटो इत्यादी कागदपत्रे सादर केलेली आहेत.

०३. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती, पंचायत समिती, जिंतुर (जि. परभणी) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रू.९९९.२५ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पंचायत समिती, जिंतुर (जि. परभणी) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या रूपये ९,९९,२५,०००/- (रूपये नऊ कोटी नव्याण्णव लक्ष पंचवीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. प्रस्तुत बांधकामास तांत्रिक मान्यता देण्यापुर्वी संकल्पन तपासून घेणे आवश्यक राहील.
२. प्रस्तुत इमारतीचे बांधकाम मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा. बां. मंडळ, मुंबई यांच्याकडील विहित नमुना आराखड्यानुसार हाती घेण्यापूर्वी, स्थानिक नगररचना प्राधिकरणाची तसचे अग्निशमन यंत्रणेची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
३. आवश्यक त्या प्रमाणपत्रांना नगरपालिका, तत्सम प्राधिकरणे इ. यांची 'मंजुरी' आणि 'ना हरकत' प्रमाणपत्रे बांधकाम सुरू करण्यापूर्वी प्राप्त करण्यात यावी.
४. नियोजित आराखड्यात महिला पदाधिकाऱ्यासाठी प्रसाधनगृहासह विश्रांती कक्षाचे संकल्पन करण्यात येवून, सदर व्यवस्था इमारतीमध्ये निर्माण करण्यात यावी.
५. प्रस्तुत प्रशासकीय इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुवीजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:र्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन - सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.
६. नियोजित जागा जिल्हा परिषदेच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

७. प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करून, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

८. या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

९. या कामी प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो संबंधित पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

१०.प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

११.प्रत्यक्ष इमारतीचे बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग क्र.ईएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१ / दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१२.महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका मधील परिच्छेद २६२ अन्वये प्रशासकीय मान्यता निर्गमित झाल्यापासून सदर बांधकाम कोणत्याही कारणास्तव पाच वर्षाच्या कालावधीमध्ये सुरू न झाल्यास सदर प्रशासकीय मान्यता अंमलात राहणार नाही.

०२. पंचायत समिती, जिंतुर (जि. परभणी) येथील नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे.

| **General Abstract For Constuction of New Administrative Building P. S. Jintur (Dist. Parbhani)** | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **Cost (In Rs.)** |
| **(A)** | **Essential Items (Components)** | |
| 1 | (a) Building proper | |
| | Admin Building | 63927800.00 |
| | **Sub Total (a)** | **63927800.00** |
| 2 | (b) Solar energy systeme | 200000.00 |
| | **Sub Total (2)** | **200000.00** |
| 3 | (c) Water supply & sanitary works 5 % of (a) | 3196390.00 |
| | (d) Internal Electrification 5 % of (a) | 3196390.00 |
| | (e) External Electrification 5 % of (a) | 3196390.00 |
| | (f) Fire fighting arrangements 2 % of (a) | 1278536.00 |
| | **Sub Total (3)** | **10867726.00** |
| | **Sub Total (A)=(1)+(2)+(3)** | **74995526.00** |
| **(B)** | **Optional Items** | |
| | (i) Water main storage and pump house bore well | 900000.00 |
| | (ii) CCTV | 16000.00 |
| | **Sub Total (C)** | **916000.00** |
| | **Project cost (P) = (A) + (B)** | **75911526.00** |
| **(C)** | **Provisions** | |
| | (i) Contingencies (2 % on P) | 1518231.00 |
| | (ii) GST 18 % for on (P) | 13664075.00 |
| | (iii) Price escalation (10 % of P) | 7591153.00 |

| General Abstract For Constuction of New Administrative Building P. S. Jintur (Dist. Parbhani) | | |
|---|---|---|
| **Sr. No.** | **Description of Item** | **Cost (In Rs.)** |
| | (iv) Insurance (1 % on P) | 759115.00 |
| | (v) Royalty & Testing charges | 480493.00 |
| | **Sub Total (C)** | **24013067.00** |
| | **Total Cost of Project (TPC) (A + B+ C)** | **99924593.00** |
| | **Says in Lakhs** | **999.25** |

०३. उपरोक्त बांधकामासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०४. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि. क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५१५५००२०६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.03.15 20:46:58 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
२. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
४. मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
६. विभागीय आयुक्त, परभणी विभाग, परभणी.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी.
८. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी.

९. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी.
१०. कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, परभणी.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परभणी.
१२. जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, परभणी.
१३. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१४. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, परभणी विभाग, परभणी.
१५. सभापती, पंचायत समिती, जिंतुर, (जि. परभणी).
१६. गट विकास अधिकारी, पंचायत समिती जिंतुर, जिल्हा परभणी.
१७. निवडनस्ती, कार्यासन बांध-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.